**महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई यांना इंडियन बँकेकडून घ्यावयाच्या रु.२६०.०० कोटी इतक्या कर्जाकरिता मंजूर शासन हमीपैकी शिल्लक कर्जाकरिता शासन हमीची मुदतवाढ देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

शासन निर्णय क्रमांकः- शाहमी १०१०/सपवव/प्र.क्र.४२/अर्थबळ.

**दिनांक :- १८/५/२०११**

**वाचा**:- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी-१०९९/प्र.क्र.६८/शा.हमी, दिनांक ५/११/१९९९

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी-१००८/प्र.क्र.१८/शा.हमी, दिनांक २८/४/२००८

३) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र. शाहमी-१०१०/सपवव/प्र.क्र.४२/अर्थबळ, दिनांक २.११.२०१०.

४) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.मुंबई यांचे पत्र क्र.खत/शा.हमी/२०१० -११ दिनांक २७.४.२०११.

**प्रस्तावना:-**

राज्यातील मागणीच्या तुलनेत खताच्या पुरवठ्यातील तूट भरुन काढण्यासाठी केंद्र शासनाच्या निर्देशानुसार केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या मे.इंडियन पोटॅश लिमिटेड, मे.इफको लि.व आरसीएफ या खत कंपन्याकडून **डी.ए.पी./युरीया/एन.पी.के खते** खत आयात करुन ते राज्यातील शेतकऱ्यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, मुंबई यांची **नोडल एजन्सी** म्हणून नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्याप्रमाणे **डी.ए.पी. २ लाख मे. टन, एन.पी.के ०.५० लाख मे.टन व युरिया ०.५० लाख मे.टन** खत असे एकूण ३.०० लाख मे. टन खत आयात मागणी करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांना निविदा प्रक्रियेनुसार कमीत कमी व्याजदर असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेकडून **रु.२६०.०० कोटी (रुपये दोनशे साठ कोटी फक्त)** चे कर्ज घेण्याकरिता वरील संदर्भ ३ मधील शासन आदेशान्वये शासन हमी मंजूर करण्यात आली होती. त्यानुसार महासंघाने उचल केलेल्या कर्जापोटी खरेदी केलेला काही खत साठा शिल्लक राहिल्याने, इंडियन बँकेकडील संपूर्ण कर्जाची परतफेड होऊ शकलेली नाही. त्यामुळे सदर साठा खरीप हंगाम-२०११ साठी वापरण्यास व उक्त रकमेस दिनांक ३१.७.२०११ पर्यंत शासन हमीची मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

प्रस्तुत प्रकरणी उक्त शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रु.२६० कोटी (रुपये दोनशे साठ कोटी) कर्जाच्या शासन हमीपैकी महासंघाने उचल केलेल्या कर्जापोटी रु.७९,७३,२४,२७०/- इतक्या रकमेचा खत साठा रब्बी हंगाम २०१० मध्ये शिल्लक राहिलेला आहे. सदर साठा खरीप हंगाम-२०११ साठी वापरण्यास व शिल्लक असलेल्या खत साठ्याच्या इंडियन बँकेकडील **रु.७९,७३,२४,२७०/- (रुपये एकोणऐंशी कोटी त्र्याहत्तर लाख चोवीस हजार दोनशे सत्तर फक्त )** इतक्या कर्जास दिनांक ३१,७.२०११ पर्यंत शासन हमीची मुदतवाढ वरील संदर्भ १ ते ३ मधील अटी तसेच खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

**( कृ. मा. प. )**

अ) दिनांक १.४.२०११ रोजी इंडियन बँकेस परतफेड करावयाच्या अदत्त असलेल्या रकमेवर हमी शुल्काचा दर प्रतिशत प्रतिवर्ष **२%** इतका राहील.

ब) सदर शासन हमीवर चक्रीय पध्दतीने कर्ज घेता येणार नाही.

२. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र.सपस-१०१०/प्र.क्र.१६२/भाग-१/२४-स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र.२/२०१०-२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( मीनल पेडणेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालाचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
६) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
९) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
१०) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०,
११) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई-४०० ००४,
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३,
१३) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५,
१४) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२१,
१५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,
१६) प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग/ कृषि व पदुम विभाग मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
१७) व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या.कन्मुर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट, मसजिदबंदर, मुंबई - ४०० ००९.
१८) वित्त विभाग (साउ /व्यय-२ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
१९) कार्यासन अधिकारी,२४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२,
२०) इंडियन बँक मांडवी शाखा, मुंबई
२१) निवड नस्ती -अर्थबळ.